साथरोग, पटकी नियंत्रण,गुप्तरोग चिकित्सा व जिल्हा वैद्यकीय अधिकारी या कार्यक्रमांर्तगत उपलब्ध अनुदानानुसार औषध खरेदीसाठी प्रशासकीय मान्यता मिळणे बाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१९/प्र.क्र.१५३/आरोग्य-८
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: २ मार्च, २०२०

संदर्भ-

१) सह संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक ससंआसे/साथरोग/औषधखरेदी/प्रशासकिय मान्यता/कक्ष-५८/१३४२६-३२/दि.१.८.२०१९.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

३)सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्रमांक ससंआसे/साथरोग/सन २०१९-२०/साथरोग औषध खरेदी/उपस्थित मुद्दे/कक्ष-५८/२८८०-८२, दिनांक २६.२.२०२०.

प्रस्तावना -

सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक १.८.२०१९ अन्वये प्रस्तावित केलेले लेखाशिर्ष क्र.२२१०४२८६, २२१००६२९, २२१०२०८, २२१००१०१ या लेखाशिर्षांमध्ये सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत तरतूद रुपये १०,६६,८०,०००/- इतकी असून सद्यस्थितीत बिडिएस प्रणालीवर लेखानुदान रु. ६,४०,०८,०००/- इतके असून ६० टक्के वितरीत रक्कम रुपये ४,६३,,४४,००/- इतकी असल्याने सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी रु. १,५३,९६,२९२/- इतक्या रक्कमेचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय-

सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक १.८.२०१९ अन्वये साथरोग, पटकी नियंत्रण, गुप्तरोग चिकित्सा व जिल्हा वैद्यकिय अधिकारी या कार्यक्रमांर्तगत उपलब्ध असलेल्या अनुदानातून राज्यातील साथरोग नियंत्रण कार्यक्रमांर्तगत जलजन्य आजार, अतिसार, गॅस्ट्रो, विषमज्वर, जलजन्य कावीळ तसेच लेप्टोस्पायरोसिस व स्वाईन फल्यू या आजारांच्या नियंत्रणासाठी रुपये १,५३,९६,२९२/- (रु.एक कोटी त्रेपन्न लाख शहाण्णव हजार दोनशे ब्याण्णव फक्त ) इतक्या रक्कमेच्या औषध खरेदीसाठी खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

विवरणपत्र

| Sr. no | Drug Name | DHO Consolidated Qty | CS Consolidate Qty | DH+CS Demand Total | Rate Rs. | DHO total Conslidated Quantity | As per Available Grant WBD Quantity | Approximate total Amount |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Ciprofloxa Tab 250 mg | 4429831 | 31505667 | 35935498 | 0.745 | 4429831 | 2000000 | 1490000 |
| 2 | Doxycycline Cap 100 mg | 22258450 | 7901619 | 30160069 | 0.674 | 22258450 | 1000000 | 674000 |
| 3 | Norfloxacin Tab 400 mg | 16155660 | 5912913 | 22068573 | 1.2314 | 16155660 | 1007200 | 1361856 |
| 4 | Oral Rehydration Salt Powder WHO Formula 20.5 gms Sachet | 27108690 | 7260932 | 34369622 | 2.2 | 27108690 | 3000000 | 6600000 |
| 5 | Ringer Lactate l..V 500 ml Bottle | 1447605 | 2939582 | 4387187 | 13.89 | 1447605 | 160000 | 2222400 |
| 6 | Metronidazole Tab 200 mg | 34942700 | 15933091 | 50875791 | 1.351 | 34942700 | 2131754 | 2880000 |
| 7 | Cefotoxime Inj 1 gm vial | 1017944 | 2715192 | 3733136 | 11.49 | 1017944 | 9400 | 108006 |
| 8 | Secinidiazole Tab 1 gm 93.1 | 636840 | 125055 | 761895 | 10.35 | 47600 | 5800 | 60030 |
| | | | | | | | **total** | **1,53,96,292/-** |

अटी :-

१) सदरहू औषधी खरेदीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर औषधी खरेदीची विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III / उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्याचे दरकरारNational pharmaceutical pricing Authority (NPPA) यांच्या कडील उपलब्ध असलेल्या न्युनतम दर विचारात घेण्यात यावेत तसेच हाफकीन संस्थेतील सदर बाबींची खरेदी झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनतम दर विचारात घेवुन त्या दरांना अंदाजित

दर म्हणून गृहित धरण्यात यावे व त्यानुसार निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी,औषधे साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजीत दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर खर्च लेखाशिर्ष क्रमांक- २२१०४२८६, २२१००६२९, २०१००२०८, २२१००१०१,या लेखाशिर्षातगत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८)सदर औषधी व औषध साहित्य खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९)संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०)शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

११) दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारीसंबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अधिकारानूसार प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे ,

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२८१६४६००७२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.03.02 15:52:16 +05'30'

**(ज.स.तडवी)**

**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई

८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर

9) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

११) अधिक्षक, विभागिय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक

१२) निवडनस्ती (आरोग्य-८)